सन २०२३-२०२४ या आर्थिक वर्षातील अर्थसंकल्पीय अनुदाने ६ शासकीय ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्रांना द्यावयाच्या अनुदानाचे वाटप. मागणी क्र. एल-३-२४१५,(०३)(०२) मुख्य लेखाशिर्ष-२४१५ ०६२४. (सातवा हप्ता - वेतन)

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास विभाग**
शासन निर्णय क्रमांकः अनुग्रा २०२३/प्र.क्र.३६/आस्था-१५
बांधकाम भवन, २५, मर्झबान पथ,
फोर्ट,मुंबई- ४०० ००१.
दिनांक : २८ मार्च, २०२४.

वाचा : १) शा.नि., ग्राम विकास व जलसंधारण विभाग, क्र. प्रशिक्षण-२०९३/प्र.क्र. ८४५/०९, दि.१७.०९.१९९३.
२) शा.परिपत्रक, ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्र.प्रशिक्षण११९९/प्र.क्र.५८१/६१,दि. २३.९.१९९८.
३) शा. परिपत्रक, ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्र.प्रशिक्षण-२०००/प्र.क्र.८५९/४४, दि.१२.६.२००१.
४) शा.परिपत्रक वित्त विभाग क्रमांक अर्थसं २०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि.१२.०४.२०२३, दि. ०५.०२.२०२४ व दि.०४.०३.२०२४.
५) शा.नि. ग्रा.वि.वि., क्र.अनुग्रा २०२३/प्र.क्र.३६/आस्था-१५, दि.१९.०४.२०२३, दि.२१.०७.२०२३, दि.२१.०९.२०२३, दि.१०.११.२०२३, दि. २८.१२.२०२३ व दि.१२.०३.२०२४.

प्रस्तावना -

सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाकरीता "मागणी क्र. एल-३, लेखाशिर्ष २४१५, कृषिविषयक संशोधन व शिक्षण ०१ - पीकसंवर्धन, १२०, शासकीय संस्थांना सहाय्यक अनुदाने (०३)(०२) ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्र (अनिवार्य) (२४१५ ०६२४)" अंतर्गत ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्रे यांना ३१ - सहायक अनुदाने (वेतनेतर) साठी रु.५८८०.०० हजार (रुपये अठ्ठावन्न लक्ष, ऐंशी हजार फक्त) व ३६ - सहायक अनुदाने (वेतन) साठी रु.६५१९७.०० हजार (रुपये सहा कोटी, एकावन्न लक्ष, सत्याण्णव हजार फक्त) अशी एकूण रु.७१०७७.०० हजार (रुपये सात कोटी, दहा लक्ष, सत्याहत्तर हजार फक्त) इतकी तदतूद अर्थसंकल्पित करण्यात आलेली आहे.

तसेच सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाकरीता सुधारीत अर्थसंकल्पिय अंदाजानुसार सहा शासकीय ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्र यांना (२४१५ ०६२४) ३१ - सहायक अनुदाने (वेतनेतर) साठी रु.४११६.०० हजार (रुपये एकेचाळीस लक्ष सोळा हजार फक्त) व ३६ - सहायक अनुदाने (वेतन) साठी रु.६१९३७.०० हजार (रुपये सहा कोटी एकोणीस लक्ष सदोतीस हजार फक्त) अशी एकूण रु.६६०५३.०० हजार (रुपये सहा कोटी साठ लक्ष त्रेपन्न हजार फक्त) इतकी तदतूद अर्थसंकल्पित करण्यात आलेली आहे. सदर अर्थसंकल्पित अनुदानापैकी आतापर्यंत ६ हप्ते वितरीत करण्यात आले असून सातवा हप्ता वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय -

वाचा येथील क्र.४ च्या परिपत्रकानुसार सन २०२३-२४ या वित्तीय वर्षाकरीता वाचा येथील क्र.५ च्या शासन निर्णयान्वये ६ शासकीय ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्रांसाठी अर्थसंकल्पिय तरतुदीच्या मर्यादेत ३१ - सहायक अनुदाने (वेतनेतर) करीता रु.४११६.०० हजार (रुपये एकेचाळीस लक्ष सोळा हजार फक्त) व ३६ - सहायक अनुदाने (वेतन) करीता रु.६१९३७.१५ हजार (रुपये सहा कोटी एकोणीस लक्ष सदोतीस हजार एकशे पन्नास फक्त) हजार असा एकुण रु.६६०५३.१५ हजार (रुपये सहा कोटी साठ लक्ष त्रेपन्न हजार एकशे पन्नास फक्त) इतका निधी वितरीत करण्यात आला आहे.

२. या विभागाकडील शासन निर्णय दि.१२.०२.२०२४ अन्वये ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्र, सिंदेवाही, चंद्रपूर यांना ३६ - सहायक अनुदान (वेतन) या उद्दीष्टाकरिता सहाव्या हप्त्यासाठी रु.२००.०० हजार (रुपये दोन लक्ष फक्त) इतका निधी विभागीय आयुक्त, नागपूर यांच्यामार्फत वितरीत करण्यात आला होता. तथापि, विभागीय आयुक्त, नागपूर यांनी सदर निधीची आवश्यकता नसल्यामुळे बिम्स प्रणालीद्वारे या विभागास समर्पित केलेला आहे. सबब, विभागीय आयुक्त कार्यालय, अमरावती यांच्या मागणीनुसार ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्र, बुलढाणा यांना सातव्या हप्त्यासाठी रु.२००.०० हजार (रुपये दोन लक्ष फक्त) इतका निधी वितरित करण्यास शासन मान्यता देत आहे.

३. प्रशिक्षण केंद्राना अनुदान द्यावयाच्या कार्यपध्दतीबाबत शासन परिपत्रक क्रमांक प्रशिक्षण-११९८/प्र.क्र.५८१/६१, दि.२३ सप्टेंबर, १९९८ व शासन परिपत्रक, ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्रमांक प्रशिक्षण २०००/प्र.क्र.८५९/४४, दि.१२ जून २००१ अन्वये निर्गमित करण्यात आलेल्या सूचनांच्या अनुंषगाने संबंधित उपायुक्त (आस्था), विभागीय आयुक्त कार्यालय यांनी सदर प्रशिक्षण केंद्रास दरमहा अनुदान अदा करण्याबाबत त्वरीत कार्यवाही करावी. तसेच वाचा येथील क्र. १ च्या शासन निर्णयातील परिच्छेद क्रमांक १२ मधील अटीनुसार केंद्रानी खर्च करावा.

४. सदर निधी वितरणाकरिता तसेच निधी ज्या बाबींकरीता मंजूर करण्यात आला आहे, त्याच बाबींवर खर्च करण्यात येईल याची काटेकोर अंमलबजावणी करण्याची जबाबदारी संबंधित उपायुक्त (आस्था) विभागीय आयुक्त कार्यालय यांची असेल. तसेच सदर निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास तात्काळ सादर करण्याची दक्षता घेण्यात यावी.

५. हा खर्च “मागणी क्र.एल ३, २४१५, कृषिविषयक संशोधन व शिक्षण (०१)पीक संवर्धन १२०- शासकीय संस्थांना सहायक अनुदाने (०३) (०२) ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्र अनिवार्य ३६ - सहायक अनुदाने (वेतन) (२४१५०६२४)” या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा आणि तो यावर्षी लेखाशिर्षांतर्गत केलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा. तसेच सदर खर्च त्याच संकेतांकाखाली खर्च पडतो आहे या बाबत ताळमेळ घालून खातरजमा करावी व विभागीय आयुक्तांनी दरमहा शासनास कळवावे. सदर लेखाशिर्षाचे आहरण व संवितरण अधिकारी म्हणून संबधित उपायुक्त (आस्थापना) हे काम पाहतील.

६. विभागीय आयुक्त कार्यालयाने प्रशिक्षण केंद्रास अनुदान वितरीत करताना वेतन/वेतनेतर बाबीवर प्रत्यक्ष किती अनुदानाची आवश्यकता आहे याची खातरजमा करुन त्यांना आवश्यक तेवढी रक्कम उपलब्ध करुन द्यावी. उपरोक्त नमूद केलेल्या अनुदानापेक्षा जास्त अनुदान वितरीत केले जाणार नाही याची दक्षता घ्यावी. तसेच प्रशिक्षण केंद्राने वेतन/वेतनेतरकरिता दरमहा किती अनुदान आवश्यक आहे याची पूर्वसूचना संबंधित आयुक्त कार्यालयास द्यावी. त्याप्रमाणे आयुक्त कार्यालयाने वेतन/वेतनेतरकरिता अनुदान वितरीत करावे. आवश्यक असलेल्या अनुदानाबाबत पूर्वसूचना न दिल्यास त्याची संपूर्ण जबाबदारी संबंधित केंद्राच्या प्राचार्यांची असेल.

७. या अनुदानातून संबंधित प्रशिक्षण केंद्राने केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे व पुस्तके तपासण्याचा अधिकार महालेखापाल, (लेखा) महाराष्ट्र-१ मुंबई आणि/किंवा महालेखापाल (लेखा) महाराष्ट्र-२ नागपूर यांना राहील व त्यांना त्यांचे हे काम योग्य तऱ्हेने पार पाडता यावे म्हणून संबंधित प्रशिक्षण केंद्र / संस्था, मदत / सुविधा पुरवतील.

८. हा शासन निर्णय दिनांक १७.०४.२०१५ सोबतच्या वित्तीय अधिकार नियमपुस्तिका १९७८ भाग १ ला, उपविभाग १ ते ५ मधील तरतूदीनुसार अ.क्र. ४ परि. २७ (२) नुसार प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारांचा वापर करून तसेच वित्त विभागाकडीलशासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/आर्थ-३, दि.०५.०२.२०२४ व दि.०४.०३.२०२४ नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक २०२४०३२८१२५८५१५२२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

SNEHAL A. ADSUL

Digitally signed by SNEHAL A. ADSUL
DN: cn=SNEHAL A. ADSUL, o=RURAL DEVELOPMENT DEPARTMENT, ou, email=snehal.rohokale@nic.in, c=IN
Date: 2024.03.28 13:30:12 +05'30'

(स्नेहल अडसूळ)
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन.

प्रत-

१. विभागीय आयुक्त, पुणे, नागपूर,अमरावती व छत्रपती संभाजी नगर (प्रत्येकी २ प्रती)
२. महासंचालक, यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, बाणेर रोड, पुणे
३. संचालक राज्य ग्रामीण विकास संस्था (यशदा), बाणेर रोड, पुणे
४. उप आयुक्त (आस्था), विभागीय आयुक्त कार्यालय, पुणे, नागपूर,अमरावती व छत्रपती संभाजी नगर
५. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे, कोल्हापूर, बुलडाणा, जालना, परभणी व चंद्रपूर.

६. महालेखापाल, (लेखा परिक्षा/लेखा अनुज्ञेयता) महाराष्ट्र - १, मुंबई.
७. महालेखापाल, (लेखा परिक्षा/लेखा अनुज्ञेयता) महाराष्ट्र-२, नागपूर.
८. वित्त विभाग, कार्यासन क्र. अर्थ-१७/व्यय-१५
९. प्राचार्य, ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्र, मांजरी फार्म पुणे, कसबाबावडा कोल्हापूर, जालना, परभणी, सिंदेवाही जि. चंद्रपूर, व बुलडाणा. (प्रत्येकी २ प्रती)
१०. कार्यासन क्र. वित्त-१ व वित्त-७ ग्राम विकास विभाग.
११. निवड नस्ती का.क्र. आस्था-१५, ग्राम विकास विभाग.